**डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना या योजनेतील सन २०१९-२० व सन २०२०-२१ मधील प्रलंबित देय रक्कम अदा करणेस मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/(६७/२१)/मशि-३,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई-४०००३२.
दिनांक : २२ मार्च, २०२२.

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.४०७/तांशि-४, दिनांक २२/०२/२०१८.

२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र.उशिसं/शिष्य-२०२१-२२/ तरतूद/६७२४,७८२४, व १०६९७, अनुक्रमे दिनांक ०३/०६/२०२१, दिनांक ०६/०७/२०२१ व दिनांक २८/०९/२०२१,

३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र.उशिसं-शिष्य/ २०२१/संकीर्ण/ १९१३, दिनांक ०२/०३/२०२२.

<u>प्रस्तावना</u> :

संचालक, उच्च शिक्षण यांच्या संदर्भीय पत्रांन्वये डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना या योजनेसाठी (२२०२ आय६६६) ३४- शिष्यवृत्त्या/विद्यावेतने या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून सन २०१९-२० मधील २५९ विद्यार्थ्यांसाठी रु.१९,३०,०००/- व सन २०२०-२१ मधील १४९१ विद्यार्थ्यांसाठी रु.१,४४,०८,०००/- असे एकूण १७५० विद्यार्थ्यासाठी रु.१,६३,३८,०००/- इतक्या रक्कमेचे देयक अदा करणेबाबत प्रस्तावित करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन प्रलंबित शिष्यवृत्तीची रक्कम प्रस्तुत योजनेसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून अदा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :

प्रस्तावनेत नमुद केल्याप्रमाणे डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना या योजनेतील सन २०१९-२० व सन २०२०-२१ करीता महाआयटी कडून शिष्यवृत्ती मंजूर झालेल्या अलॉटमेंटनुसार मंजूर विद्यार्थ्यांची प्रलंबित शिष्यवृत्तीची रु.१,६३,३८,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी त्रेसष्ट लक्ष अडतीस हजार फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास पुढील अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अटी :- डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजनेकरीता प्रस्तावात नमूद केलेले विद्यार्थी संदर्भिय क्र.१) येथील शासन निर्णय, दि. २२/०२/२०१८ मधील अटी व शर्तीची पूर्तता करीत असल्याची खात्री संचालक, उच्च शिक्षण यांनी करावी, याबाबतची जबाबदारी उच्च शिक्षण संचालनालयाची राहील.

२. या बाबींवर येणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण ८० सर्वसाधारण, १०७ - शिष्यवृत्त्या (०१) साधारण शिष्यवृत्त्या (०१) (१२) डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना (२२०२ आय६६६) ३४- शिष्यवृत्ती व विद्यावेतने" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ मधील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३ हा शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ अनुक्रमे क्र.२५२/१४७१, दिनांक २०/०७/२०२१ व क्र.२९३/२०२२/व्यय-५, दिनांक ०८/०३/२०२२ नुसार प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत असून शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४/०६/२०२१ व दिनांक १४/१०/२०२१ व शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०३/०२/२०२२ मधील अटी व शर्तीची पूर्तता होत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्र. २०२२०३२२११५४४९६६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Hemantkumar Pandharinath Baviskar

Digitally signed by Hemantkumar Pandharinath Baviskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=71de9bdf8c28541d92a5cd36d722315bab7f006ec54206337 22d42e0976d82a8, cn=Hemantkumar Pandharinath Baviskar
Date: 2022.03.22 11:56:24 +05'30'

**( हे.पं.बाविस्कर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५. कक्ष अधिकारी, साशि.१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. निवड नस्ती मशि-३, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.